**कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम, २०१३ मधील तरतूदीनुसार राज्यात कार्यरत अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांविरुध्द लैंगिक छळाच्या तक्रारींच्या चौकशींचे संनियंत्रण करण्याकरिता संनियंत्रण समिती व सदर तक्रारींच्या चौकशीकरिता अंतर्गत तक्रार समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- भाप्रसे ११२१/प्र.क्र.१६४/१० अ**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३ सप्टेंबर, २०२१

**वाचा :-**

(१) कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम, २०१३

(२) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, मकचौ-२०१३/प्र.क्र. ६३/मकक, दिनांक १९.०६.२०१४

(३) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, मकचौ-२०१३/प्र.क्र. ६३/मकक, दिनांक ११.०९.२०१४

**प्रस्तावना :-**

कामाच्या ठिकाणी महिलांच्या होणाऱ्या लैंगिक छळवणूकीस प्रतिबंध करण्यासाठी केंद्र शासनाकडून, कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम, २०१३ व दिनांक ०९.१२.२०१३ रोजी, कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) नियम, २०१३, प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर अधिनियमातील कलम ४ नुसार अंतर्गत तक्रार समिती व कलम ६ नुसार यथास्थिती स्थानिक तक्रार समित्या स्थापन करण्याची तरतूद आहे.

२. रिट याचिका क्रमांक ३३९६/२०१९ राशी विरुध्द भारत सरकार व इतर या न्यायालयीन प्रकरणी दिनांक ०४.१२.२०२० रोजी अंतिम निकालामध्ये मा. दिल्ली उच्च न्यायालयाने पुढील निरीक्षणे नोंदविलेली आहेत:-

Para 37. "Under the above facts and circumstances, it is directed that a Committee be constituted by the Cabinet Secretariat, constituting of such persons who are independent and unbiased, to enquire into the allegations made by the Petitioner/Complainant. The Committee shall be constituted within four weeks. "

Para 38. The present judgment be also placed before the appropriate authorities for considering the constitution of an independent ICC to deal with sexual harassment complaints against high ranking officers of the level of Joint Secretary and above working in various Government departments and Ministries.

३. प्रशासकीय विभागांकडून गठित अंतर्गत तक्रार समितीवरील नियुक्त शासकीय अध्यक्ष व सदस्य तसेच जिल्हाधिकारी यांचेमार्फत गठीत स्थानिक तक्रार समितीवरील नियुक्त अशासकीय अध्यक्ष व शासकीय सदस्य हे अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या तुलनेत निम्न स्तरावरील असतात. यास्तव मा. न्यायालयाने नोंदविलेल्या निरीक्षणांच्या अनुषंगाने अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांविरुध्द प्राप्त लैंगिक छळवणूकीच्या तक्रारींची चौकशी स्वतंत्र व नि:पक्षपातीपणे होण्याकरिता मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संनियंत्रण समिती व सदर तक्रारींची चौकशी करण्याकरिता अंतर्गत तक्रार समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढील आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**<u>शासन आदेश :-</u>**

अखिल भारतीय सेवेतील भारतीय प्रशासकीय सेवा या संवर्गातील अधिकारी सामान्य प्रशासन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली कार्यरत आहेत. तसेच अखिल भारतीय सेवेतील भारतीय पोलीस सेवा व भारतीय वन सेवा या संवर्गातील अधिकारी अनुक्रमे, गृह विभाग व वन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली कार्यरत आहेत. अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांविरुध्द प्राप्त होणाऱ्या लैंगिक छळाच्या तक्रारींच्या चौकशीचे संनियंत्रण करण्याकरिता राज्य स्तरावर मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे संनियंत्रण समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| अध्यक्ष | मा. मुख्य सचिव |
| सदस्य | भाप्रसे संवर्गातील वरिष्ठ महिला अधिकारी |
| सदस्य | भापोसे संवर्गातील वरिष्ठ महिला अधिकारी |
| सदस्य | भावसे संवर्गातील वरिष्ठ महिला अधिकारी |
| सदस्य सचिव | सह सचिव/उप सचिव (भाप्रसे आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय. |

२. प्रस्तावनेत नमूद वस्तुस्थिती विचारात घेता, अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांविरूद्ध प्राप्त होणाऱ्या लैंगिक छळाच्या तक्रारींची चौकशी करण्याकरिता कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम, २०१३ कलम ४ मधील तरतूदीनुसार खालीलप्रमाणे अंतर्गत तक्रार समिती गठित करण्यात येत आहे :-.

| | |
|---|---|
| अध्यक्ष | अखिल भारतीय सेवा संवर्गातील वरिष्ठ महिला अधिकारी |
| सदस्य | शासकीय सदस्य |
| सदस्य | शासकीय सदस्य |

| | |
|---|---|
| सदस्य | अशासकीय सदस्य-महिलांचे प्रश्नविषयक क्षेत्रात कार्याचा अनुभव असणाऱ्या नोंदणीकृत अशासकीय संस्थेच्या महिला पदाधिकारी |
| सदस्य सचिव | मंत्रालय विभाग प्रमुखाविषयी तक्रार असल्यास सह सचिव/उप सचिव (भाप्रसे आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय हे सदस्य सचिव असतील. **अन्यथा** संबंधित प्रशासकीय विभागाचे क्षेत्रीय आस्थापना विषयक बाबी हाताळणारे सह सचिव/उप सचिव हे सदस्य सचिव असतील. |

सदर समितीचा कार्यकाल ३ वर्षाचा राहील. अंतर्गत तक्रार समितीच्या अध्यक्ष व सदस्यांची नेमणूक मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली असलेल्या संनियंत्रण समितीमार्फत करण्यात येईल.

३. सदर समितीच्या कार्यपध्दतीविषयक तरतूदी कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम, २०१३ मध्ये विहित केल्याप्रमाणे तसेच महिला व बाल विकास विभागाने वेळोवेळी निर्धारीत केल्याप्रमाणे राहतील.

सदर शासन आदेश महिला व बाल विकास विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक ५२३/०२.०८.२०२१ व विधी व न्याय विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक बी-४३५/१०.०८.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२३१४४७४२९००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUJATA MANOJ SAUNIK

Digitally signed by SUJATA MANOJ SAUNIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=04f6ff0d1ef522f4e19358cfac66e30d146fa47249c32a356455a756d05ec1a9, pseudonym=0F4316152AE9704C9E34CC2EF2A8EB14A7151070, serialNumber=F49173DCDA3F795FF41A69777F5A6C2DED24F621CD434ABBB169565D1ABDAA1F, cn=SUJATA MANOJ SAUNIK
Date: 2021.09.23 14:48:42 +05'30'

**( सुजाता सौनिक )**
**अपर मुख्य सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई- ४०००३५
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
४) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
५) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
६) सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
७) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख
८) निवड नस्ती (कार्यासन १० अ)